**मुंबई व मुंबई महानगर क्षेत्र जागतिक दर्जाचे नागरी संकूल निर्माण करण्यासाठी गृहनिर्माण अभियान (मिशन) राबविण्यासाठी सुकाणू समिती गठीत करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्रमांक :झोपसु-२०१०/प्र.क्र.१६९/झोपसू-१,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दिनांक : ७ सप्टेंबर, २०१०.

**संदर्भ** :- १) मा. मुख्य सचिव यांचे पत्र क्र.मुविप्र-२००९/प्र.क्र.१२०/विप्र., दि.१५.१.२०१०.

२) सामान्य प्रशासन विभागाचे समक्रमांक दि.९.१२.२००९ व सचिव, विशेष प्रकल्प, सामान्य प्रशासन विभाग यांचे दि.१.१.२०१० चे पत्र.

**प्रस्तावना** :-

मा.मुख्यमंत्री महोदयांचे अध्यक्षतेखाली दि.२४.११.२००९ रोजी सहयाद्री अतिथी गृह, मुंबई येथे आयोजित केलेल्या नागरी कृती मंचाच्या बैठकीमध्ये मुंबई तसेच मुंबई महानगर क्षेत्र हे जागतिक दर्जाचे नागरी समुह म्हणून विकसित करण्याच्या दृष्टीकोनातून विविध ६ क्षेत्रांमध्ये सुनियोजित अभियान राबविण्याचे ठरविले आहे. उपरोक्त संदर्भाधीन दि. १.१.२०१० व दि.१५.१.२०१० च्या पत्रान्वये गृहनिर्माण अभियानासंदर्भात गृहनिर्माण विभागास सुकाणू विभाग (Nodal Department) घोषित करण्यात आले आहे. तसेच गृहनिर्माण अभियानाची रुपरेषा आखून त्याअंतर्गत मुंबई व मुंबई महानगर क्षेत्रास जागतिक दर्जाचे स्वरुप देण्याच्या दृष्टीने उद्दिष्ट निश्चिती व कालबध्द कार्यक्रम राबविण्याचा प्रस्ताव तयार करुन मा.मुख्य सचिव यांच्यामार्फत शासनाच्या मान्यतेकरीता सादर करण्याचे निर्देश दिले आहेत. सदर अभियान कार्यक्रम आखण्याकरीता व राबविण्याकरीता आवश्यक असल्यास विभागाच्या नेतृत्वाखाली प्रस्तावित अभियान कार्यक्रमाशी संबंधित यंत्रणांच्या प्रतिनिधींची व इतर संबंधितांची समिती गठीत करण्यात यावी, असे निर्देश दिले आहेत.

उपरोक्त निर्देश लक्षात घेता मुंबई व मुंबई महानगर क्षेत्राकरीता गृहनिर्माण अभियान राबविण्याच्या दृष्टीने खालील वस्तुस्थिती नमूद करण्यात येत आहे:-

राज्य शासनाचे गृहनिर्माण विषयक धोरण, सन २००७ मध्ये विहित करण्यात आले आहे. सदर गृहनिर्माण धोरणानुसार सर्वांसाठी परवडणारी घरकुले निर्माण करण्याबरोबरच आर्थिकदृष्टया दुर्बल घटक, अल्प उत्पन्न गट व मध्यम उत्पन्न गटाच्या गृह निर्मितीवर भर देण्यात येत आहे. राज्याच्या गृहनिर्माण धोरणात सुधारणा विषयक तरतुदी व उदारीकरण तसेच गृहनिर्माण क्षेत्रातील आव्हानांना सामोरे जाण्यासाठी विविध उपाययोजनांवर भर देण्यात आला आहे. त्याबरोबरच गृहनिर्माण विभागाच्या आगामी ५ वर्षात भविष्यात हाती घ्यावयाचे विविध गृहनिर्माण प्रकल्प व कालबध्द कृती आराखडा, व्हीजन डाक्युमेंटच्या माध्यमातून निश्चित करण्यात आले आहे.

उपरोक्त बाबी लक्षात घेता गृहनिर्माण अभियान राबविण्याबाबत शासन स्तरावर पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

राज्यात मुंबई व मुंबई महानगर क्षेत्र प्रमुख आर्थिक केंद्र असून राज्यातील २.५ कोटी लोकसंख्या या भागात वास्तव्य करते. नागरीकरणाच्या सर्वात मोठया नागरी संकुलाच्या गृहनिर्माण विषयक अडीअडचणींवर मात करण्यासाठी व क्षेत्रास जागतिक दर्जाचे नागरी समुह म्हणून विकसित करण्याच्या दृष्टीकोनातून गृहनिर्माण अभियानांतर्गत खालील उपक्रम हाती घ्यावयाचे असून अभियानांतर्गत उद्दिष्ट निश्चिती व कालबध्द कृती आराखडा उपक्रमनिहाय ठरविणे आवश्यक आहे. गृहनिर्माण अभियान (मिशन) मध्ये अंतर्भूत प्रमुख व ठळक बाबी खालीलप्रमाणे असतील.

१) **सर्वांसाठी परवडणारी घरे :-**
गृहनिर्माण विभागाच्या व्हिजन डाक्युमेंट मध्ये आघाडी शासनाच्या जाहिरनाम्यात नमूद विविध मुद्यांचा अंतर्भाव करण्यात आला असून त्यातील प्रामुख्याने आगामी ५ वर्षात १० लक्ष परवडणारी घरे निमाण करण्याचा महत्वकांक्षी उपक्रम हाती घेण्याचा मानस आहे. मोठया प्रमाणावर परवडणा-या घरांची उपलब्धता व्हावी याकरीता खाजगी सार्वजनिक भागीदारी तत्वातून निर्मिती करणे करीता मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली MCHI समवेत संयुक्त समिती स्थापन करुन त्याद्वारे आगामी ५ वर्षात ५ लक्ष घरकुलाच्या निर्मितीचे उद्दिष्ट शासन निर्णय, दि.१ जून,२०१० अन्वये निश्चित करण्यात आले आहे.

परवडणाऱ्या घरांसंदर्भात पारेख समितीच्या शिफारशींनुसार परवडणा-या घरांची व्याख्या निश्चित करणे व उपलब्धता वाढीबाबत विविध उपाययोजना हाती घेणे आवश्यक आहे. यासंदर्भात नगर विकास विभागाकडून नियोजन विकास आराखडयात चटई क्षेत्र निर्देशांकात वाढीव तरतूद व नियोजन आराखडयात काही क्षेत्र या प्रयोजनाकरीता आरक्षित ठेवणेबाबत प्रयत्न करणे गरजेचे आहे. तसेच या प्रयोजनासाठी काही भूखंड आरक्षित ठेवण्याबाबत देखील प्रयत्न होणे गरजेचे आहे.

**२) गरिबांसाठी गृहनिर्माण योजना :-**

केंद्र शासनाच्या जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनरुथ्थान अभियान अंतर्गत शहरी गरिबांसाठी मुलभूत सोयी पुरविणे (BSUP) व एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम राबविण्यात येत असून त्याद्वारे झोपडपट्टीधारकांसाठी घरकुले निर्मिती सोबत मुलभूत सुविधा पुरविण्यावर देखील भर देण्यात येत आहे. मुंबई महानगर क्षेत्रात आगामी काळात केंद्रशासनाने नुकत्याच घोषित केलेल्या राजीव आवास योजनेच्या माध्यमातून झोपडपट्टीमुक्त शहरे निर्माण करण्याची मोहिम हाती घेण्याचा मानस आहे. याकरिता प्रत्येक शहरनिहाय व झोपडपट्टीनिहाय नियोजन आराखडा व झोपडपट्टयांचे सर्वेक्षण करणे अपेक्षित आहे.

**३) झोपडपट्टयांचा विकास व पुनर्वसन :-**

झोपडपट्टी मुक्त मुंबई व मुंबई महानगर करणेसाठी एकात्मिक झोपडपट्टी विकास धोरण निश्चिती करिता मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय समितीचे गठण करण्यात आलेले आहे. आगामी काळात झोपडपट्टी पुनर्वसन योजनेतील लाभार्थ्यांची पात्रता निश्चितीबाबत सुधारित धोरण निश्चित करणे, पुनर्वसन योजनेतील समुह झोपडपट्टी विकासाकरीता निकष विहित करणे, योजनेतील परिशिष्ट-२ कालमर्यादेत प्रमाणित करण्याकरीता मार्गदर्शक तत्वे निश्चित करणे तसेच महाराष्ट्र झोपडपट्टी (सु.नि.व.पु.)अधिनियम, १९७१ मध्ये सुधारणा करणे इत्यादि बाबींवर गृहनिर्माण अभियाना अंतर्गत धोरण निश्चित करणे अभिप्रेत आहे.

**४) जुन्या व मोडकळीस आलेल्या इमारतींची दुरुस्ती व पुनर्विकास :-**

मुंबई महानगर क्षेत्रातील जुन्या व मोडकळीस आलेल्या इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्विकासाकरीता कालानुरुप होणारे बदल लक्षात घेता सुधारीत धोरण निश्चित करण्याची गरज तसेच जुन्या व मोडकळीस आलेल्या इमारतींच्या पुनर्विकासाकरीता अफझलपुरकर समितीच्या शिफारशींनुसार कार्यवाही करणे, संयुक्त विकासाचे धोरण अवलंबविणे तसेच उपकरप्राप्त इमारतींच्या भाडेकरु निश्चितीकरीता सुधारीत मार्गदर्शक तत्वे विहित करणे इत्यादि बाबी गृहनिर्माण अभियानात अंतर्भूत करण्यात येत आहे.

**५) भाडेतत्वावर घरकुल योजना:-**

मुंबई महानगर क्षेत्रात रोजगाराच्या संधी विचारात घेता मोठया प्रमाणावर लोकांचे होत असल्याने त्यांच्या निवा-याबाबत स्वस्त व परवडणा-या भाडेतत्वावरील घरकुल योजना राबविण्याबाबत आगामी काळात भर देण्याची गरज आहे. भाडेतत्वावरील घरांची निर्मिती व त्यांचे संनियंत्रण करण्याबाबत धोरण निश्चित करणे गरजेचे आहे.

**६) जमिनीचे लेखा परिक्षण :-**

वाढत्या नागरिकरणाच्या दरानुसार शहरातील वाढत्या लोकसंख्येस परवडणा-या घरांचा आवश्यक साठा उपलब्ध करुन देण्याकरीता शहरातील जमिनीचे लेखापरिक्षण करुन विविध सार्वजनिक उपक्रम जसे म्हाडा, सिडको, एमएमआरडीए, एसपीपीएल यांच्यामार्फत जमिनीची उपलब्धता निश्चित करणे आवश्यक आहे.

**७) झोपडयांचे जीआयएस मॅपिंग व सॅटेलाईट इमेजींगद्वारे सर्वेक्षण व बायो-मेट्रीक ओळखपत्र देणे:-**

शहरातील झोपडपट्टयांचा विकास व पुनर्वसन योजना राबविण्यासाठी झोपडपट्टयांचे सर्वेक्षण (सॅटेलाईट इमेजींगद्वारे) व वैयक्तिक लाभार्थ्यांची पात्रता निश्चित करण्याकरीता बायो-मेट्रिक ओळखपत्र देऊन योजनेत पारदर्शकता व जबाबदारी चे तत्व रुजविता येईल.

**८) गृहनिर्माण विषयक विविध सुधारणा (Reforms):-**

ग्राहक उपयोगी विविध कायद्यात जसे मोफा (MOFA), म्हाडा अधिनियम, झोपडपट्टी अधिनियमामध्ये सुधारणा करणे, ३ - Pro-poor reforms च्या अंमलबजावणीबाबत मार्गदर्शक तत्वे विहित करणे तसेच गृहनिर्माण क्षेत्रातील बांधकाम विषयक विविध तक्रार निरसन करण्याकरीता नियामक आयोगाची स्थापना करणे इत्यादि बाबींकरीता धोरण निश्चित करणे आवश्यक ठरते.

९) **हाऊसिंग टेक्नॉलॉजी :-**
ग्रीन हाऊसिंग, किमान खर्चाची, गुणात्मक व पर्यावरणाशी सुसंगत शाश्वत तंत्रज्ञान विकसित करणे.

१०) **गृहनिर्माण विषयक विविध अधिनियमात दुरुस्ती व नियमांचे सुलभीकरण :-**
MHADA Act, SLUM Act, MOFA Act, DCR Rules Amendment

११) **गृहनिर्माण विषयक सार्वजनिक उपक्रमातील संसस्थीय रचनेतील आवश्यक सुधारणा:-**
म्हाडा, सिडको, एमएमआरडीए व विविध स्थानिक स्वराज्य संस्थामधील प्रशासकीय व संस्थीय रचनेत कालपरत्वे बदल होणा-या आव्हानाना तोंड देण्यासाठी सुधारणा करणे व त्यांची कार्यक्षमता व पारदर्शकता वाढविणे करीता आवश्यक बदल सुचविणे.

१२) **इतर आवश्यक उपाययोजना**

उपरोक्त नमूद गृहनिर्माण विषयक ठळक विषयांबाबत गृहनिर्माण अभियान राबविण्याच्या दृष्टीने सचिव (गृ.नि.) यांच्या अध्यक्षतेखाली अभियानाकरीता धोरण निश्चिती व विविध उपघटकांसाठी उद्दिष्ट निश्चिती व कालबध्द कार्यक्रम निश्चित करण्यासाठी खालील विविध अधिकारी व विभाग प्रमुख यांची सुकाणू समिती गठीत करण्यात येत आहे. सदर सुकाणू समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १) | सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई | - अध्यक्ष |
| २) | सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - सदस्य |
| ३) | सचिव, विशेष प्रकल्प, सामान्य प्रशासन विभाग | - सदस्य |
| ४) | सचिव, पर्यावरण विकास विभाग | - सदस्य |
| ५) | उपाध्यक्ष तथा सचिव, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, | - सदस्य |
| ६) | आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण | - सदस्य |
| ७) | आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका | - सदस्य |
| ८) | जिल्हाधिकारी, मुंबई शहर | - सदस्य |
| ९) | जिल्हाधिकारी, मुंबई उपनगरे | - सदस्य |
| १०) | मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरण | - सदस्य |
| ११) | व्यवस्थापकीय संचालक, सिडको | - सदस्य |
| १२) | प्रकल्प व्यवस्थापक, MTSU | - सदस्य |
| १३) | सचिव, दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ | - सदस्य |
| १४) | संचालक, नागरी प्रशासन संचालनालय, मुंबई | - सदस्य |
| १५) | आयुक्त, ठाणे महानगर पालिका | - सदस्य |
| १६) | आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका | - सदस्य |
| १७) | आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका | - सदस्य |
| १८) | आयुक्त, कल्याण डोंबिवली महानगरपालिका | - सदस्य |
| १९) | आयुक्त, मिरा-भाईंदर महानगर पालिका | - सदस्य |
| २०) | आयुक्त,वसई-विरार महानगरपालिका | - सदस्य |
| २१) | आयुक्त, भिवंडी-निजामपूर महानगरपालिका | - सदस्य |
| २२) | मुख्य अधिकारी, पनवेल, अबरनाथ, बदलापूर. | - सदस्य |
| २३) | उपसचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय | -सदस्य सचिव |

उपरोक्त सुकाणू समितीची बैठक सचिव (गृ.नि.) तथा अध्यक्ष सुकाणू समिती यांच्या निर्देशानुसार वेळोवेळी घेण्यात येईल. सदर समितीमार्फत गृहनिर्माण अभियाना संदर्भात धोरण निश्चिती व मुंबई व मुंबई उपनगरास जागतिक दर्जाचे नागरी समुह करण्याच्या दृष्टीकोनातून विविध उपाययोजना व उद्दिष्ट निश्चिती करण्यासाठी कालबध्द कार्यक्रम, विविध विषयनिहाय सविस्तर कार्यक्रम विहित करण्यात येईल. यासंदर्भात सुकाणू समितीमार्फत आगामी ९० दिवसांत निश्चित प्रस्ताव शासनास सादर करणे अपेक्षित आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळ www.maharashtra.gov.in वर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 201009081438 51001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(संजय इंगळे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

D:\Ingale sir dic\gr.doc

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. राज्यमंत्री(गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव
६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
७. महालेखापाल(लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
८. सर्व विभागीय आयुक्त
९. उपाध्यक्ष तथा सचिव, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,
१०. आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण
११. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका
१२. जिल्हाधिकारी, मुंबई शहर
१३. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगरे
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरण, मुंबई
१५. व्यवस्थापकीय संचालक, सिडको
१६. प्रकल्प व्यवस्थापक, MTSU
१७. सचिव, दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ
१८. संचालक, नागरी प्रशासन संचालनालय, मुंबई
१९. आयुक्त, ठाणे महानगर पालिका
२०. आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका
२१. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका
२२. आयुक्त, कल्याण डोंबिवली महानगरपालिका
२३. आयुक्त, मिरा-भाईंदर महानगर पालिका
२४. आयुक्त,वसई-विरार महानगरपालिका
२५. आयुक्त, भिवंडी-निजामपूर महानगरपालिका
२६. मुख्य अधिकारी, पनवेल, अबरनाथ, बदलापूर.
२७. उपसचिव, (झोपसु-१)गृहनिर्माण विभाग, मंत्रालय
२८. या विभागातील सर्व कार्यासने